अर्थसंकल्पिय अनुदान २०१७-२०१८
"२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता ,१९६जिल्हा परिषद/ पंचायत संस्थांना सहाय्य - महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१, याच्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने- (स्थानिक क्षेत्र) (०१)(०७)नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारीवर्ग (२२१५१९१४)" मागणी क्रमांक वाय-२

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः बजेट-१४१७/प्र.क्र.१२९/पापु-२३

गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, ७ वा मजला
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: १५ एप्रिल, २०१७

**वाचा :-**

**शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०१७/प्र.क्र.६८/अर्थसंकल्प-३,दिनांक १ एप्रिल,२०१७**

**प्रस्तावना:-**

सन २०१७-२०१८ चा अर्थसंकल्प दिनांक १८ मार्च, २०१७ रोजी विधानमंडळास सादर करण्यात आला. सदर अर्थसंकल्पावर मागणीनिहाय चर्चा होऊन संपूर्ण अर्थसंकल्पास मंजूरी मिळेपर्यन्त काही भागासाठीचा खर्च भागविण्यासाठी विधानमंडळाने महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) विधेयक, २०१७ मंजूर केले आहे. सदर विधेयकाचे अधिनियमात रुपांतर झाले असून ते महाराष्ट्र अधिनियम क्रमांक-२४ म्हणून महाराष्ट्र शासन, राजपत्र असाधारण भाग-४, दिनांक २९ मार्च, २०१७ मध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे. तसेच सन २०१७-१८ या वर्षाकरिता अर्थसंकल्पीय प्रणालीवर उपलब्ध असलेले लेखा अनुदान वितरीत करण्यास उपरोक्त परिपत्रकान्वये वित्त विभागाने परवानगी दिली आहे.

२. जिल्हा परिषदेमधील ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारी वर्ग यांचे वेतन व वेतनेतर खर्च भागविण्यासाठी मागणी क्रमांक वाय-२ "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य (जिल्हा स्तर) (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने-(स्थानिक क्षेत्र) (०१)(०७) नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारी वर्ग (२२१५ १९१४)" या लेखाशिर्षाखाली

वित्तीय वर्ष सन २०१७-२०१८ करिता ३६,सहायक अनुदाने (वेतन) साठी रुपये १०,१६,१०,०००/- (अक्षरी रुपये दहा कोटी सोळा लाख दहा हजार फक्त) व ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) साठी रुपये ८,५०,०००/- (अक्षरी रुपये आठ लाख पन्नास हजार फक्त ) अशी एकूण रुपये १०,२४,६०,०००/- (अक्षरी रुपये दहा कोटी चोवीस लाख साठ हजार फक्त) इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे.

३. आता वित्त विभागाने सन २०१७-२०१८ करीता उपरोक्त अर्थसंकल्पीय तरतूदीपैकी अंदाजे २५% निधी वेतन व वेतनेतरसाठी अर्थसंकल्पीय प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेला आहे. परंतु सर्व ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद यांचेकडून अनुदान मागण्या प्राप्त झालेल्या नाहीत, त्यामुळे जिल्हा परिषदांकडून सन २०१६-२०१७ या वित्तीय वर्षात खर्च झालेले एकूण अंतिम अनुदान विचारात घेऊन त्यानुसार तीन महिन्यासाठीचा अंदाजीत निधी वितरित करण्याचे प्रस्तावित आहे. त्यास अनुसरुन जिल्हा परिषदेमधील ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारीवर्ग यांचा वेतन व वेतनेतर खर्च भागविण्यासाठी लेखाशिर्ष २२१५ १९१४ अंतर्गत एकूण रुपये १,८६,७४,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी श्याऐंशी लाख चौ-याहत्तर हजार फक्त) इतक्या निधीचे वाटप जिल्हा परिषद, ठाणे, पालघर, रत्नागिरी, सातारा, सांगली, कोल्हापूर, जालना, नांदेड, अकोला, यवतमाळ व नागपूर यांना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१७-२०१८ या वित्तीय वर्षासाठी "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य (जिल्हा स्तर) (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने-(स्थानिक क्षेत्र) (०१)(०७) नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारीवर्ग (२२१५ १९१४) " या लेखाशिर्षाखाली ३६, सहायक अनुदाने (वेतन) व ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर ) साठी या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्र अ मधील स्तंभ ७ मध्ये दर्शविल्यानुसार एकूण रुपये १,८६,७४,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी श्याऐंशी लाख चौ-याहत्तर हजार फक्त) इतके अनुदान संबंधित मुख्य लेखा व वित्त अधिकारी, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद ठाणे, पालघर, रत्नागिरी, सातारा, सांगली, कोल्हापूर, जालना, नांदेड, अकोला, यवतमाळ व नागपूर यांना मंजूर करण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेले अनुदान शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहील. या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्र अ मधील स्तंभ क्रमांक ७ मध्ये दर्शविण्यात आलेल्या रकमांपेक्षा अधिक खर्च होणार नाही याची दक्षता सर्व संबंधित

आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी. तसेच सदर निधी ज्या प्रयोजनासाठी आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च होईल याचीही दक्षता घेण्यात यावी.

३. सदर शासन निर्णयान्वये तसेच यापूर्वी वितरित केलेल्या निधीची उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर केल्याची खात्री करुनच पुढील आवश्यक निधीची मागणी करण्याची दक्षता घेण्यात यावी. पुढील मागणीपत्र प्राप्त झाल्याशिवाय निधी वितरीत केला जाणार नाही याची संबंधित जिल्हा परिषदांनी नोंद घ्यावी.

४. या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात आलेल्या लेखानुदानातून होणारा खर्च मागणी क्रमांक वाय-२ "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य (जिल्हा स्तर) (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने-(स्थानिक क्षेत्र) (०१)(०७) नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारीवर्ग (२२१५ १९१४)" ३६, सहायक अनुदाने (वेतन) व ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१७-२०१८ या वित्तीय वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१७/ प्र.क्र.६८/अर्थसंकल्प-३, दिनांक १ एप्रिल, २०१७ अन्वये विभागांना दिलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४१५१११६२०८८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satish V Kove

Digitally signed by Satish V Kove
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=W.S.S.D., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e13b027a7b550970150cf7dc69d276db3b1a6ebe3f71610fb5e8ff55b1676c8a, cn=Satish V Kove
Date: 2017.04.15 15:18:55 +05'30'

**( सतीश वि. कोवे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. विधानसभा / विधान परिषद, सर्व

२. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. विभागीय आयुक्त, सर्व
४. संचालक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, पुणे
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे, पालघर, रत्नागिरी, सातारा, सांगली, कोल्हापूर, जालना, नांदेड, अकोला, यवतमाळ व नागपूर
६. सर्व जिल्हा परिषदेचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी, ठाणे, पालघर, रत्नागिरी, सातारा, सांगली, कोल्हापूर, जालना, नांदेड, अकोला, यवतमाळ व नागपूर
७. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, ठाणे, पालघर, रत्नागिरी, सातारा, सांगली, कोल्हापूर, जालना, नांदेड, अकोला, यवतमाळ व नागपूर
८. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा)
९. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा)
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे, पालघर, रत्नागिरी, सातारा, सांगली, कोल्हापूर, जालना, नांदेड, अकोला, यवतमाळ व नागपूर
११. उप अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा उप विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
१२. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई
१३. वित्त विभाग, (व्यय-३ व अर्थ-१९)
१४. कार्यासन क्रमांक पापु-०४ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१५. ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१६. निवड नस्ती कार्यासन पापु-२३

| विवरणपत्र -अ | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| शासन निर्णय पा.पु.व स्व.वि.क्रं.बजेट-१४१७/ प्र.क्र.१२९/पापु-२३, दिनांक १५ एप्रिल , २०१७ चे सहपत्र | | | | | | | |
| मागणी क्र. वाय-२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता - १९६,जिल्हा परिषद / पंचायत संस्थांना सहाय्य (जिल्हा स्तर) (०१) पंचायत संस्थाना सहाय्य , महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम - १९६१ च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने (स्थानिक क्षेत्र) (०१) (०७) नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारी वर्ग (२२१५ १९१४) | | | | | | | |
| अ. क्र. | जिल्हयाचे नाव | सन २०१७-२०१८ करीता या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेले अनुदान | | | | | लेखाशिर्ष २२१५ १९१४ खाली वितरीत करण्यात येत असलेली एकूण रक्कम (अक्षरी रुपये) |
| | | वेतन | प्रवास खर्च | कार्यालयीन खर्च | रकाना क्र ४+५ ची एकूण रक्कम | वितरीत करण्यात येत असलेली एकूण रक्कम (३+६) | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | ठाणे | १६९५००० | ४५००० | ० | ४५००० | १७४०००० | रूपये सतरा लाख चाळीस हजार फक्त |
| २ | पालघर | २०१०००० | ५५००० | ० | ५५००० | २०६५००० | रूपये वीस लाख पासष्ठ हजार फक्त |
| ३ | रत्नागिरी | ४६५०००० | ३५००० | ० | ३५००० | ४६८५००० | रूपये सेहेचाळीस लाख पंच्याऐंशी हजार फक्त |
| ४ | सातारा | ८४००० | ५००० | ० | ५००० | ८९००० | रूपये एकोणनव्वद हजार फक्त |
| ५ | सांगली | १२१५००० | ० | ० | ० | १२१५००० | रूपये बारा लाख पंधरा हजार फक्त |
| ६ | कोल्हापूर | ३१५००० | २५००० | ० | २५००० | ३४०००० | रूपये तीन लाख चाळीस हजार फक्त |
| ७ | जालना | ७५०००० | ३००० | ० | ३००० | ७५३००० | रूपये सात लाख त्रेपन्न हजार फक्त |
| ८ | नांदेड | ४११०००० | १२००० | ० | १२००० | ४१२२००० | रूपये एक्केचाळीस लाख बावीस हजार फक्त |
| ९ | अकोला | २२९५००० | ० | ० | ० | २२९५००० | रूपये बावीस लाख पंच्याण्णव हजार फक्त |
| १० | यवतमाळ | १२९०००० | ३०००० | ० | ३०००० | १३२०००० | रूपये तेरा लाख वीस हजार फक्त |
| ११ | नागपूर | ५०००० | ० | ० | ० | ५०००० | रूपये पन्नास हजार फक्त |
| | एकूण | १८४६४००० | २१०००० | ० | २१०००० | १८६७४००० | रूपये एक कोटी श्याऐंशी लाख चौ-याहत्तर हजार फक्त |

Satish V Kove

Digitally signed by Satish V Kove
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=W.S.S.D., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e13b027a7b550970150cf7dc69d276db3b1a6ebe3f71610fb5e8ff55b1676c8a, cn=Satish V Kove
Date: 2017.04.15 15:19:25 +05'30'

(सतीश वि. कोवे)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन